



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**मंत्रालय मुख्य इमारत, पहिला मजला मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

क्रमांक : गौखनि -५०अ/०१२०/प्र.क्र.०३/ख-२ दिनांक : १४ डिसेंबर, २०२१

**विषय : गौण खनिज-गोंदिया**

"सन २०१८-१९ करीता मौजे सावंगी-२, ता. सडक अर्जुनी या वाळूगटातून मंजूर वाळूपैकी उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत करणेबाबत."
- श्री. पुरूषोत्तम रामेश्वरदास लोहिया.

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, गोंदिया यांना उपरोक्त विषयाबाबतचे पत्र क्र/अका/खनिज/कावि-११८७/२०१९, दि.२३.०९.२०१९ व क्र.अका/खनिज/सीआर-५१/२०१९/कावि-३३/२०२०, दि.२१.०१.२०२० रोजीच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१८-१९ करीता मौजे सावंगी-२ ता. सडक अर्जुनी हा वाळूगटाचा दि.१९.०३.२०१९ रोजी ई लिलावान्वये १५९० ब्रास वाळूकरीता श्री. पुरूषोत्तम रामेश्वरदास लोहिया यांना रू.२६,००,०००/- (मात्र सव्वीस लाख रूपये) इतक्या सर्वोच्च बोलीस दि.२०.०३.२०१९ रोजीच्या आदेशान्वये मंजूर करण्यात आला. त्यानुसार सदर वाळूगटाचा ताबा तहसिलदार, सडक अर्जुनी यांनी दिला.

मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.३३९८/२०१९ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.२९.०४.२०१९ रोजी पारीत केलेल्या आदेशानुसार जिल्हाधिकारी कार्यालयाने लिलावधारकास दि.३.०५.२०१९ रोजीच्या पत्रान्वये वाळूगटातील वाळू उत्खनन व वाहतूक पुढील आदेशापर्यंत बंद करण्याबाबत कळविण्यात आले आहे. तद्नंतर, जिल्हाधिकारी, गोंदिया यांच्या दि.१०.०६.२०१९ रोजीच्या पत्रान्वये रेतीघाटातून थांबविण्यात आलेले वाळूचे उत्खनन व वाहतूक पुर्ववत सुरू करण्याबाबत कळविण्यात आले.

०२. लिलावधारक यांना वाळूगटातून मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल रिट याचिका क्र.३३९८/२०१९ मधील आदेशानुसार लिलावधारकास वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या कालावधीकरीता परतावा करावयाच्या रकमेमधुन शासन निर्णय दि.०३.०१.२०१८ मधील परिच्छेद क्र.९ अ) १२ नुसार लिलावाच्या रक्कमा विहित कालावधीत न भरल्याने लिलावाच्या सर्वोच्च बोलीच्या ¼ रक्कम जप्त करून उर्वरीत रक्कम रू.४,४७,३६३/- (मात्र चार लाख सत्तेचाळीस हजार तीनशे त्रेसष्ट रूपये) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. श्री. लोहिया यांना रक्कम रू.४,४७,३६३/- (मात्र चार लाख सत्तेचाळीस हजार तीनशे त्रेसष्ट रूपये) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करून घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०४. या बाबीवर होणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२११२१४१६२७१४६६१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SADANAND
GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2021.12.14 16:29:08 +05'30'

**( स. गो. मोहिते )**
कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी, गोंदिया.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२ नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया.
५) अवर सचिव (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.
६) निवडनस्ती "ख-२" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ०३२.